**शांतीनिकेतन सहकारी गृहनिर्माण संस्था म., अमरावती या संस्थेचा भूखंड गहाणमुक्त करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. एचएसजी-२०१५/प्र.क्र.१/१८-स,**
नविन प्रशासकीय भवन, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालयासमोर, मुंबई :- ४०० ०३२.
दिनांक :- ०१ एप्रिल, २०१७

संदर्भ :- १) शासन निर्णय कृषि व सहकार, विभाग क्र.एचएसजी-१०८०/४०६/८१/१/१८-सी दिनांक :- २६/३/८१, दि.२७/७/८२ व दि.२२/२/८५
२) शासन निर्णय क्र.एचएसजी-१०८०/४०६/१८-सी दि.३ डिसेंबर १९८६
३) संस्थेचा प्रस्ताव दि.१२/९/२०१४

**प्रस्तावना :-**

शांतिनिकेतन सहकारी गृहनिर्माण संस्था म., अमरावती या संस्थेतील २० पात्र सभासदांना संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये वाढीव कर्जासह एकूण कर्ज रु.४,६५,९२०/- (रु.चार लाख पासष्ट हजार नऊशे वीस फक्त) इतके व संदर्भ क्र.२ अन्वये श्रीमती सरिता चंद्रकांत पोहेकर यांना रु.३०,४००/- (रु.तीस हजार चारशे फक्त) असे एकूण रु.४,९६,३२०/-कर्ज मंजूर करण्यात आले होते तथापि संस्थेला रु.४,९६,३२०/- (रु.चार लाख छायण्णव हजार तीनशे वीस फक्त) इतके कर्ज संस्थेला वितरीत करण्यात आले होते.

संदर्भ क्र.३ येथे संस्थेने सादर केलेल्या प्रस्तावानुसार तसेच सर्व २१ कर्जदार सभासदांनी त्यांना वितरीत केलेली कर्जाची रक्कम त्यावरील व्याजासह शासनास परतफेड केली आहे. तसेच सर्व सभासदांना निर्गमित केलेल्या ना देय प्रमाणपत्रांवरुन कर्ज व त्यावरील व्याजाची वसूली झाल्याचे विभागाच्या वसूली कक्षानेही प्रमाणित केले आहे. संस्थेकडे शासनाचे येणे बाकी नसल्यामुळे संस्थेचा भूखंड गहाणखतातून मुक्त करण्याचा संस्थेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर बाब विचारात घेऊन शासन आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय :-**

शांतिनिकेतन सहकारी गृहनिर्माण संस्था मर्या., अमरावती या संस्थेच्या एकूण २१ सभासदांना वितरीत करण्यात आलेले गृहबांधणी कर्ज रु.४,९६,३२०/- (रु.चार लाख शहाण्णव हजार तीनशे वीस फक्त) व त्यावरील संपूर्ण रक्कम व्याजासह शासनास परतफेड केली आहे, सदर संस्थेकडे शासनाचे कोणतेही येणे बाकी नसल्याने संस्थेचा भूखंड व त्यावरील इमारत गहाणखतातून मुक्त करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०११२५०२६५३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Shankar Bhujbal

Digitally signed by Ashok Shankar Bhujbal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d0603fd89ef561b0b051d6283b2c15bb82dcdd5e5dfe04798b8f19ffa9581722, cn=Ashok Shankar Bhujbal
Date: 2017.04.01 12:52:13 +05'30'

**(अ.शं.भुजबळ)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरीक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता) (२ प्रती).
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरीक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता) (२ प्रती).
३) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) सहकार आयुक्त व निबधक, सहकारी संस्था, पूणे.
६) संचालक, विमा संचालनालय, मुंबई गृहनिर्माण भवन (म्हाडा), खोली क.२६४, पहिला माळा,वांद्रे (पूर्व), मुंबई :- ४०० ०५१.
७) जिल्हाधिकारी, अमरावती/नागपूर.
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था अमरावती.
९) जिल्हा विशेष लेखापरिक्षक (वर्ग-१), सहकारी संस्था, अमरावती.
१०) सहायक निबंधक, सहकारी संस्था, ता.जि.अमरावती.
११) अध्यक्ष/सचिव, शांतिनिकेतन सहकारी गृहनिर्माण संस्था, म., अमरावती.
१२) निवडनस्ती १८-स.